**दक्षता जनजागृती सप्ताह (Vigilance Awareness Week) साजरा करण्याबाबत.**

दि.२६ ऑक्टोबर,२०१५ ते दिनांक ३१ ऑक्टोबर,२०१५

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

शासन परिपत्रक क्रमांक - दजस २०१५/प्र.क्र.८२/११/११-अ

मंत्रालय, मुंबई -४०००३२

दिनांक - १९ ऑक्टोबर, २०१५

**पहा :-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - संकीर्ण-२००१/११२८/ प्र.क्र.४३/०१/११-अ, दि. २२ ऑक्टोबर, २००१

## शासन परिपत्रक

राज्यात दरवर्षी दक्षता जनजागृती सप्ताह (Vigilance Awareness Week) आयोजित करण्याचा निर्णय संदर्भाधीन दिनांक २२ ऑक्टोबर, २००१ च्या शासन आदेशान्वये घेण्यात आला आहे. सदर आदेशाची प्रत सोबत जोडली आहे.

२. या वर्षी दिनांक २६ ऑक्टोबर,२०१५ ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१५ या कालावधीत दक्षता जनजागृती सप्ताहाचे आयोजन करण्यात आले असल्याचे केंद्रीय दक्षता आयोग, नवी दिल्ली यांनी दिनांक ३१ ऑगस्ट, २०१५ च्या परिपत्रकान्वये कळविले आहे. त्याची प्रत सोबत जोडली आहे.

३. या वर्षी राज्यात दिनांक २६ ऑक्टोबर,२०१५ (सोमवार) ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१५ (शनिवार) या कालावधीत दक्षता जनजागृती सप्ताहाचे (Vigilance Awareness Week)आयोजन करण्यात यावे, असे कळविण्यात येत आहे. सप्ताहाचे आयोजन करताना दिनांक २२ ऑक्टोबर, २००१ च्या शासन निर्णयातील अ,ब,क,ड व इ या मुद्यांमध्ये नमूद केलेल्या सूचनांचा अवलंब करण्यात यावा. या सप्ताहानिमित्त घ्यावयाच्या प्रतिज्ञा/शपथेचा नमुना तसेच मा. राज्यपाल महोदय आणि मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या संदेशाच्या प्रती सोबत जोडण्यात येत आहेत. विहित नमुन्यातील शपथ ग्रहणाचा एक कार्यक्रम विभागीय / कार्यालयीन स्तरावर दक्षता सप्ताहाच्या कालावधीत आयोजित करण्यात यावा.

४. या सप्ताहाच्या आयोजनासाठी स्वतंत्रपणे निधी उपलब्ध करुन देता येणार नसल्याने प्रत्येक कार्यालयाने त्यांच्याकडील उपलब्ध निधीतून खर्च करावयाचा आहे.

५. दक्षता जनजागृती सप्ताहाच्या आयोजनासंबंधीची जबाबदारी महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग यांच्यावर सोपविण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी या सूचना त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणाव्यात.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५१०१९१४५६०६२३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

BHAT VENKATESH MADHAV

Digitally signed by BHAT VENKATESH MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMIN DEPT,CID - 916890, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e277c9088a4cb8b53e535a4642a6800b908c5dbdb3a63175760874eba717ae1, cn=BHAT VENKATESH MADHAV
Date: 2015.10.19 14:59:36 +05'30'

**( व्यं.मा.भट)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) राज्यपालाचे सचिव,

२) मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) शासनाचे मुख्य सचिव/ सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव,
५) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
७) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
८) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
९) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
११) आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१३) सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
१४) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख
१५) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१६) निवडनस्ती.

दक्षता जनजागृती सप्ताह (Vigilance Awareness Week) साजरा करण्याबाबत.
दि.३१ ऑक्टोबर, ते ६ नोव्हेंबर

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२००१/११२८/प्र.क्र.४३/०१/११-अ,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ ऑक्टोबर, २००१.

**शासन निर्णय :-**

राज्यात गतवर्षी प्रथमच दि. ३१ ऑक्टोबर ते ४ नोव्हेंबर, २००० या कालावधीत "दक्षता जागरुकता सप्ताह" (Vigilance Awareness Week) आयोजित करण्यात आला होता. जनतेमध्ये भ्रष्टाचाराबाबत जागृती निर्माण करण्याच्या दृष्टीने सदर उपक्रम अत्यंत उपयुक्त सिध्द झाल्याने आता, प्रतिवर्षी सरदार वल्लभभाई पटेल यांच्या दि.३१ ऑक्टोबर या जन्मदिवसापासून एक आठवडा (दि. ३१ ऑक्टोबर ते ६ नोव्हेंबर) या कालावधीत "दक्षता जनजागृती सप्ताहाचे"(Vigilance Awareness Week) आयोजन करण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला आहे.

दक्षता जनजागृती सप्ताहाचे आयोजन करताना पुढे नमूद केलेल्या मार्गांचा अवलंब करण्यात यावा.

अ) राज्य शासनाचे सर्व विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ कार्यालय प्रमुख, राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम, सहकारी संस्था, स्वायत्त संस्थामार्फत सप्ताहाचे आयोजन करण्यात यावे.

ब) दि. ३१ ऑक्टोबर रोजी सकाळी ११.०० वाजता भ्रष्टाचार निर्मूलनाची शपथ घेऊन कार्यक्रमाचा प्रारंभ होईल. विभाग/ कार्यालय प्रमुख किंवा उपस्थितांपैकी ज्येष्ठतम अधिकारी सर्वांना शपथ देतील. (शपथेचा नमुना सोबत जोडला आहे.)

क) शपथ घेतल्यानंतर मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांनी या सप्ताहानिमित्त दिलेला संदेश उपस्थितांना वाचून दाखविण्यात येईल.

ड) या सप्ताहाच्या निमित्ताने मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांचा संदेश राज्यातील जनतेसाठी प्रसृत करण्यात यावा.

इ) या सप्ताहाच्या निमित्ताने पुढील कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.
   १. कार्यालयाच्या दर्शनी भागात व मोक्याच्या ठिकाणी भित्तीपत्रक, कापडी फलक लावणे.
   २. कार्यालये/शाळा/महाविद्यालयांमध्ये भ्रष्टाचाराच्या दुष्परिणामांवर प्रकाश टाकण्यासाठी चर्चासत्रे/ वादविवाद स्पर्धा/व्याख्याने/निबंधस्पर्धा/कार्यशाळा यांचे आयोजन करणे.
   ३. विशेष पुस्तिकांचे (Special Journal) प्रकाशन करणे.
   ४. राज्यातील अशासकीय संघटना, स्वयंसेवी संस्था, सामान्य नागरीक यांना दक्षता जनजागृती मोहिमेत सहभागी होण्याचे आवाहन करणे.

कृ.मा.प.

५. केंद्रीय दक्षता आयोगाच्या http://www.cvc.nic.in या संकेतस्थळावर (Web-site) उपलब्ध साहित्याचा जनतेमध्ये वितरणासाठी उपयोग करणे.

याव्यतिरिक्त कार्यालयीन इमारतीच्या दर्शनी भागावर "भ्रष्टाचारासंबंधी काही माहिती असल्यास अगर लाच मागणाऱ्या लोकसेवकाबद्दल तक्रार असल्यास लाचलुचपत प्रतिबंध विभागाशी संपर्क साधावा" अशी सूचना व लाचलुचपत प्रतिबंध विभागाच्या स्थानिक कार्यालयाचा पत्ता आणि दूरध्वनी क्रमांक लिहिलेला कायमस्वरुपी फलक लावण्यात यावा.

या सप्ताहाच्या आयोजनासाठी स्वतंत्रपणे निधी उपलब्ध करुन देता येणार नसल्याने प्रत्येक कार्यालयाने त्यांच्याकडील उपलब्ध निधीतूनच खर्च करावा.

दक्षता जनजागृती सप्ताहाच्या आयोजनासंबंधीची जबाबदारी महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंध विभाग यांच्यावर सोपविण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(बी.के.अग्रवाल)
शासनाचे अपर मुख्य सचिव.

प्रति,

राज्यपालांचे प्रधान सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान सभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* आयुक्त राज्य निवडणूक आयोग, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
सा.प्र.विभागातील सर्व प्रशासकीय कार्यासने,
निवड नस्ती.
* पत्राने

Telegraphic Address :
"SATARKTA: New Delhi

E-Mail Address
cenvigil@nic.in

Website
www.cvc.nic.in

EPABX
24600200

फैक्स/Fax : 24651186




# केन्द्रीय सतर्कता आयोग
# CENTRAL VIGILANCE COMMISSION




सतर्कता भवन, जी.पी.ओ. कॉम्पलैक्स,
ब्लॉक-ए, आई.एन.ए., नई दिल्ली-110023
Satarkta Bhawan, G.P.O. Complex,
Block A, INA, New Delhi 110023

सं./No. 015/VGL/065/293536

दिनांक / Dated 31.08.2015

**Circular No. 11/08/15**

**Subject: Observance of Vigilance Awareness Week-2015**

Central Vigilance Commission being the apex vigilance institution of the country, has been striving to promote probity and integrity in governance. One of the primary objectives of Central Vigilance Commission is to create public awareness against corruption and observance of vigilance awareness week every year is one such measure for achieving this objective. The Commission has decided that this year the Vigilance Awareness Week would be observed from 26th to 31st October. This year the theme of Vigilance Awareness Week is "Preventive Vigilance as a tool of Good Governance".

2. The Commission has been laying stress on the efficacy of preventive vigilance in curbing corruption. The Vigilance Manual of the Commission states unequivocally that the role of Vigilance Officers is predominantly preventive. Preventive vigilance could broadly be described as a package of measures to improve systems and procedures in a way so as to reduce scope for discretion and eliminate corruption.

3. Good governance is about the processes for making good decisions and their effective implementation. The main characteristics of good governance are transparency, accountability, following rule of law, being inclusive, effective and efficient. Good governance and preventive vigilance share several characteristics and therefore, preventive vigilance needs to be implemented as a tool of good governance. Application of preventive vigilance as a tool of good governance would not only result in removing the negative connotations attached with vigilance work but would also contribute positively towards the overall functioning of the organization.

4. Ministries/Departments/PSUs/Banks/Organizations are advised to consider the following activities during the Vigilance Awareness Week:-

i) To display banners, posters etc. at prime locations in their offices.
ii) To display banners, posters etc. at places with public interface such as Branches of the banks, Petrol pumps, Railway Stations, Airports.
iii) To carry out media campaign at an appropriate scale on anti-corruption.
iv) To organize debates/lectures/essay writing competitions on moral values, ethics, good governance practices etc. amongst the employees and colleges/schools in local areas and to distribute prizes.
v) To bring out special issue of journals during the period and

vi) To request the Non-Government Organizations, institutions and service associations in the local area to participate in the vigilance awareness campaign.

5. This year the Commission has desired that debates be organized on a large scale involving youth and college students. The debate competitions should be organized in all the major cities of the country and CVOs may coordinate among themselves for taking responsibility for a particular city. This would ensure that vigilance becomes a point of discussion by reaching out to the youth in metros and 30-40 tier 2 cities all over India.

6. Since the theme of Vigilance Awareness Week this year is 'Preventive Vigilance as a tool of Good Governance', this opportunity should be utilized to implement preventive vigilance in a big way.

7. In order to reach out to common public and convey the message that corruption does not pay and also to highlight the positive role being played by the Vigilance Wings of various organizations through Preventive Vigilance, the Commission is working on getting made six short episodes which would be telecast during the Vigilance Awareness Week from 26th to 31st October, 2015. The Commission desires that CVOs may also explore the possibility of carrying out sustained media campaigns.

8. Public Sector Enterprises, Societies and Local Authorities are also advised that message (pledge) may be read to Board of Directors by respective chairman in the Board/Governing Body meeting held prior to the Vigilance Awareness Week.

9. A report on observance of the Week may be sent to the Central Vigilance Commission by 30th November, 2015 by all Departments/Organizations.

10. This notification is also available on the Commission's website at http:/www.cvc.nic.in.

Nilam Sawhney

**( Nilam Sawhney)**
**Secretary**

Encl: As stated

To

i) The Secretaries of all Ministries/Departments of Government of India
ii) The Chief Secretaries of all States/Union Territories
iii) The Comptroller & Auditor General of India
iv) The Chairman, Union Public Service Commission
v) The Chief election Commissioner, Election Commission
vi) Chief Executives of all PSUs/Bank/Organizations
vii) All Chief Vigilance Officers in Ministries/ Departments/ PSEs/Public Sector Banks/Insurance Companies/Autonomous Organizations/Societies.

## प्रतिज्ञा

हम, भारत के लोक सेवक, सत्यनिष्ठा से प्रतिज्ञा करते हैं कि हम अपने कार्यकलापों के प्रत्येक क्षेत्र में ईमानदारी और पारदर्शिता बनाए रखने के लिए निरंतर प्रयत्नशील रहेंगे । हम यह प्रतिज्ञा भी करते है कि हम जीवन के प्रत्येक क्षेत्र से भ्रष्टाचार उन्मूलन करने के लिए निर्बाध रूप से कार्य करेंगे । हम अपने संगठन के विकास और प्रतिष्ठा के प्रति सचेत रहते हुए कार्य करेंगे । हम अपने सामूहिक प्रयासों द्वारा अपने संगठनों को गौरवशाली बनाएंगे तथा अपने देशवासियों को सिद्धान्तों पर आधारित सेवा प्रदान करेंगे । हम अपने कर्त्तव्य का पालन पूर्ण ईमानदारी से करेंगे और भय अथवा पक्षपात के बिना कार्य करेंगे ।

## PLEDGE

WE, THE PUBLIC SERVANTS OF INDIA, DO HEREBY SOLEMNLY PLEDGE THAT WE SHALL CONTINUOUSLY STRIVE TO BRING ABOUT INTEGRITY AND TRANSPARENCY IN ALL SPHERES OF OUR ACTIVITIES. WE ALSO PLEDGE THAT WE SHALL WORK UNSTINTINGLY FOR ERADICATION OF CORRUPTION IN ALL SPHERES OF LIFE. WE SHALL REMAIN VIGILANT AND WORK TOWARDS THE GROWTH AND REPUTATION OF OUR ORGANISATION. THROUGH OUR COLLECTIVE EFFORTS, WE SHALL BRING PRIDE TO OUR ORGANISATIONS AND PROVIDE VALUE BASED SERVICE TO OUR COUNTRYMEN. WE SHALL DO OUR DUTY CONSCIENTIOUSLY AND ACT WITHOUT FEAR OR FAVOUR.

CH. Vidyasagar Rao
GOVERNOR OF MAHARASHTRA






3/12.19.

RAJ BHAVAN
Malabar Hill
Mumbai 400 035
Tel. : 022-2363 2660
Fax.: 022-2368 0505

12 October 2015

# MESSAGE

Corruption is a major issue that adversely affects the economy of the nation, delivery of various services to the people and the quality of life at large. At a time when India is making a serious attempt to emerge as a Global leader, corruption can negate the gains of development, perpetuate inequalities and harm the fair image of the nation in the eyes of the world.

It has been found that excessive rules and regulations, complicated procedures, discretionary powers and lack of transparency breeds corruption. During this week, officials and citizens should deliberate on ways and means to simplify procedures and do away unnecessary procedures and regulations. The Right to Public Services Act is an affirmative step towards achieving the goal of good governance and ending corruption. Maharashtra must provide leadership to the nation in the fight against corruption.

I am pleased to know that the Vigilance Awareness Week is being observed in the State from 26th October to 31st October 2015. I appeal to the citizens of Maharashtra to resolve to make Maharashtra and India corruption-free.

**(CH. Vidyasagar Rao)**

मुख्य मंत्री
महाराष्ट्र






Chief Minister
Maharashtra

5/टि.पि.

७ ऑक्टोबर २०१५

**शुभेच्छा**

राज्य शासनातर्फे २६ ते ३१ ऑक्टोबर या कालावधीत दक्षता जनजागृती सप्ताहाचे आयोजन करण्यात आले असल्याचे समजून आनंद झाला.

शासकीय यंत्रणेतील भ्रष्टाचाराला पायबंद घालण्यासाठी सर्व पातळ्यांवर प्रयत्न झाल्यास शासनाच्या कल्याणकारी योजनांचा लाभ सर्वसामान्य नागरीकांना पूर्णत: मिळू शकेल. त्यादृष्टीने आम्ही प्रशासकीय सुधारणा आणि बदलांवर प्राधान्याने लक्ष केंद्रित केले आहे. शासकीय यंत्रणेतील सर्व घटकांनीही सर्वसामान्य जनतेप्रती असलेली उत्तरदायित्वाची भावना लक्षात घेऊन आपल्या मानसिकतेत अनुरूप बदल घडविणे आवश्यक आहे. तरच जनता आणि शासन यातील अंतर कमी होण्यास मदत होऊन शासकीय उपक्रमातील लोकसहभाग अधिक वाढू शकेल.

गतिमानता आणि पारदर्शकतेसोबतच भ्रष्टाचारमुक्त शासनाचे ध्येय साध्य करण्यासाठी शासन विविध उपाययोजना राबवित आहे. मंत्रालयात एकवटलेल्या अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्यासह क्रांतिकारी स्वरुपाच्या सेवा हक्क कायदा निर्मितीच्या माध्यमातून सर्वप्रथम जनतेस वेळेत सेवेची हमी देण्यात आली आहे. तसेच आपले सरकार वेब पोर्टलद्वारे विविध सेवा ऑनलाईन करण्यात आल्या आहेत. अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन शासकीय कार्यव्यवहार भ्रष्टाचारमुक्त करण्याचे आमचे प्रयत्न आहेत. त्यादृष्टीने या दक्षता जनजागृती सप्ताहात राबविण्यात येणाऱ्या उपक्रमांच्या माध्यमातून जनतेचे प्रबोधन व्हावे, अशी अपेक्षा आहे.

सप्ताहानिमित्त आयोजित विविध उपक्रमांस शुभेच्छा!

**(देवेंद्र फडणवीस)**